**कला संचालनालयाच्या नियंत्रणाखालील शासकीय कला महाविद्यालये आणि अशासकीय अनुदानित कला संस्थाकडून चालविण्यात येणाऱ्या सर्व अभ्यासक्रमांच्या प्रवेशामध्ये लक्षणीय अपंगत्व असलेल्या विद्यार्थ्यांसाठी ५% जागा राखून ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१८/प्र.क्र. ९८/तांशि-६**
मंत्रालय विस्तार भवन,मादाम कामा मार्ग ,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०००३२.
दिनांक : २६ ऑक्टोबर, २०१८

**संदर्भ :** १) अपंग व्यक्ती हक्क अधिनियम ,२०१६.
२) आयुक्त, अपंग कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.अकआ/प्र-७/मोफतशिक्षण/क-३१(२)/२०१७-१८/२८, दिनांक २०/६/२०१७.

**प्रस्तावना :-**

अपंग व्यक्ती हक्क अधिनियम ,२०१६ च्या (The rights of persons with Disabilities Act, 2016,) कलम ३२ मध्ये उच्च शिक्षण देणाऱ्या शासकीय संस्था आणि शासनाकडून अनुदान प्राप्त होणा-या संस्थामध्ये लक्षणीय अपंगत्व असलेल्या विद्यार्थ्यांसाठी जागा राखून ठेवण्यासंदर्भात पुढील तरतूद आहे.

1) All Government institutions of higher education and other higher education institutions receiving aid from the Government shall reserve not less than five per cent seats for persons with benchmark disabilities.
2) The person with benchmark disabilities shall be given an upper age relaxation of five years for admission in institutions of higher education.

वरील तरतूदीनुसार शासकीय कला महाविद्यालये व अशासकीय अनुदानित कला संस्थाकडून चालविण्यात येणा-या सर्व अभ्यासक्रमांच्या प्रवेशामध्ये लक्षणीय अपंगत्व असणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी जागा राखून ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुसार पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :-**

कला संचालनालयाच्या नियंत्रणाखालील शासकीय कला महाविद्यालये व अशासकीय अनुदानित कला संस्थाकडून चालविण्यात येणाऱ्या सर्व अभ्यासक्रमांच्या प्रवेशामध्ये

अ) लक्षणीय अपंगत्व असणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी ५ टक्के जागा राखीव ठेवण्यात येत आहेत.
ब) प्रवेशाकरिता असलेली उच्चतम वयोमर्यादा लक्षणीय अपंगत्व असलेल्या विद्यार्थ्यांकरिता ५ वर्ष शिथील करण्यात येत आहे.

यासाठी विविध अभ्यासक्रमाच्या प्रवेश नियमांमध्ये संचालक, कला संचालक यांनी आवश्यक ती सुधारणा करावी.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८१०२६११५९३५०७०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sandesh Rajaram Utekar

Digitally signed by Sandesh Rajaram Utekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=009789e9fe23fde06096381e43bebecd32b5c692c899745eee7d89d805005a87, cn=Sandesh Rajaram Utekar
Date: 2018.10.26 12:04:54 +05'30'

**( सं.रा.उतेकर )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण , मंत्रालय मुबंई.
२. मा.राज्यमंत्री,उच्च व तंत्रशिक्षण, मंत्रालय , मुंबई
३. आयुक्त, राज्य सामाईक प्रवेश परीक्षा तथा सचिव, प्रवेश नियामक प्राधिकरण, ८ वा मजला, न्यु एक्सलसिअर इमारत, ए.के.नायक मार्ग, फोर्ट, मुंबई - ४०० ००१
४. संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. आयुक्त, अपंग कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. सर्व संबंधित संस्था (कला संचालनालयामार्फत).
७. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवड नस्ती/तांशि-४.